201407251243322008

**तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांच्या अंतर्गत कार्यरत शासकीय तंत्रनिकेतने/अभियांत्रिकी महाविद्यालये व तत्सम अनुदानित संस्थांमधील शिक्षकांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या शिफारशीनुरुप लागू करावयाची करियर ॲडव्हान्समेंट योजना —स्पष्टीकरणात्मक खुलासा**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.एटीयु २०००/७४/२०००/तांशि-६,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२,**
**दिनांक- ६ फेब्रुवारी २००६**

संदर्भ :-१. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. आरपीएस २१९८/७७/तांशि-६, दि.१८.१२.१९९९
२. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. एटिव्ही २०००/७४/तांशि-५, दि.१३.३.२००२
३. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.आरपीएस १२२०/१/तांशि -५, दि.२७.२.२००३
४.शासन निर्णय,उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.एटीयु २०००/७४/२०००/तांशि-५ दि.८.११.२००४
५. शासन निर्णय,उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. वेपुर-२१९९/३०/तांशि -६, दि.१८.१२.१९९९
६.अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेचे पत्र क्र.एफडी/पीएसएससी/क्लॅरि/२००३/१, दि.१०.९.२००३
७.अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेचे पत्र क्र.एफडी/पीएसएससी/क्लॅरि/२००३/१, दि.१९.९.२००३
८.अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेचे पत्र क्र.एफडी/पीएसएससी/क्लॅरि/२००३/१, दि.१७.१२.२००३
९. शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.एनजीसी-१८९२/(२२२४)/युनि-४ दि.१२.२.१९९४
१०.शासन निर्णय,उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. युएसजी १२९८/३४०२४/(४७१२)/विशि-४, दि.६.३.१९९९
११.शासन निर्णय,उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. एनजीसी१२९८/(४६१९)/२/विशि-४, दि.११.१२.१९९९
१२.शासन निर्णय,उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. एनजीसी-१२००/७३३९६/(१५/२०००)/विशि-४, दि.१३.६.२०००
१३. विद्यापीठ अनुदान आयोगाचे पत्र क्र. एफ २-३/२००० (पीएस) दि. १२.५.२००५
१४. उच्च व तंत्रशिक्षण विभागाचे पत्र क्र. एनजीसी २००४/(५८/४)/विशि-४ दि.१७.६.२००५
१५. संचालक, तंत्र शि क्षण, यांचे पत्र क्र. ४अ/आस्था/वश्रेनिश्रे/२००५/९९८, दि .२५.११.२००५

**शासन निर्णय :-** उपरोक्त संदर्भ-१ अन्वये अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या सुधारित वेतनश्रेण्या अभियांत्रिकी महाविद्यालयातील शिक्षकीय पदांना लागू करुन संदर्भ-२ मधील शासन निर्णयांन्वये या पदांना करियर ॲडव्हासमेंट योजना लागू करण्यात आली आहे. याचप्रमाणे उपरोक्त संदर्भ-३ मधील शासननिर्णयांन्वये तंत्रनिकेतनातील शिक्षकीय पदांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या सुधारित वेतनश्रेणी व करियर ॲडव्हासमेंट योजना लागू करण्यात आली आहे. दरम्यानच्या कालावधीत उपरोक्त संदर्भ-६ ते ८ मधील पत्रान्वये अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने दिलेले स्पष्टीकरण व सूचना विचारात घेऊन संदर्भ- ४ मधील शासन निर्णयांन्वये अभियांत्रिकी महाविद्यालय व तंत्रनिकेतनातील शिक्षकीय पदांना लागू केलेल्या करियर ॲडव्हासमेंट योजनेत काही बदल करण्यात आले आहेत. याप्रकारे उपरोक्त संदर्भ- १ ते ४ मधील सूचनांचा एकत्रितपणे विचार करुन अभियांत्रिकी महाविद्यालये तथा तंत्रनिकेतनातील शिक्षकीय पदांना करियर

ॲडव्हासमेंट योजना लागू करताना तंत्रशिक्षण संचालनालयास अनेक अडचणी येत असल्याने संचालनालयामार्फत तथा शिक्षक संघटनेमार्फत शासनाकडे सतत विचारणा होत आहे. यामुळे तंत्रशिक्षण संचालनालयाने त्यांच्या संदर्भ-१५ मधील पत्रात उपस्थित केलेल्या व इतर महत्त्वाच्या मुद्यांच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण देण्यात येत आहे.

**१. संदर्भ -४ मधील शासन निर्णयानुसार करियर ॲडव्हासमेंट योजना लागू करण्याचा दिनांक-**

उपरोक्त संदर्भ - १ मधील शासन निर्णयानुसार अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या सुधारित वेतनश्रेण्या अभियांत्रिकी महाविद्यालयातील शिक्षकीय पदांना दि.१.१.९६ पासून लागू करण्यात आल्या असून संदर्भ-२ मधील शासन निर्णयान्वये सदर पदांना करियर ॲडव्हासमेंट योजनेसाठी सुधारित सेवाशर्ती दि.१.१.९६ पासूनच लागू करण्यात आल्या आहेत. यामुळे संदर्भ - ४ मधील शासन निर्णयानुसार संदर्भ- ६,७ व ८ मधील स्पष्टीकरणाद्वारे लागू होणा-या सुधारित सेवाशर्ती सुध्दा दि.१.१.९६ पासून लागू होतील. परंतु सुधारित सेवाशर्तीद्वारा देय होणारे आर्थिक लाभ मात्र दि.२७.७.९८ पासून देय ठरतील.

संदर्भ-३ मधील शासन निर्णयानुसार तंत्रनिकेतनातील शिक्षकीय पदांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या सुधारित वेतनश्रेण्या दि.१.१.९६ पासून अभावितपणे लागू करुन सुधारित श्रेणीमुळे मिळणारा आर्थिक लाभ दि. २७.२.२००३ पासून लागू करण्यात आला आहे. यामुळे तंत्रनिकेतनातील शिक्षकीय पदांना करियर ॲडव्हासमेंट योजनेच्या सुधारित सेवाशर्ती दि.१.१.१९९६ पासून लागू होतील व याद्वारे त्यांना देय ठरणारे आर्थिक लाभ दि.२७.७.९८ ते दि.२६.२.२००३ पर्यंत संदर्भ-५ मधील शासन निर्णयानुसार देय ठरणा-या वेतनश्रेणीत व तदनंतर संदर्भ- ३ मधील शासन निर्णयान्वये देय ठरणाऱ्या वेतनश्रेणीनुसार खालीलप्रमाणे लागू होतील.

| अ.नं | पदनाम | कालावधी | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | अधिव्याखाता (वरीष्ठ श्रेणी) | दि.२७.७.१९९८ ते दि.२६.२.२००३ | रु.१०,०००-३२५-१५,२०० |
| | | दि.२७.२.२००३ पासून | रु.१०,०००-३२५-१५,२०० |
| २ | अधिव्याखाता (निवड श्रेणी) | दि.२७.७.१९९८ ते दि.२६.२.२००३ | रु.१२,०००-३७५-१६,५०० |
| | | दि.२७.२.२००३ पासून | रु.१२,०००-४२०-१८३०० |

**२. अभियांत्रिकी महाविद्यालय व तंत्रनिकेतनातील अतांत्रिक विषयातील शिक्षकांना लागू करावयाच्या करियर ॲडव्हासमेंट योजना**

उपरोक्त संदर्भ-४ मधील शासन निर्णयानुसार अतांत्रिक विषयातील अधिव्याख्यात्यांना करियर ॲडव्हासमेंट योजनेचे लाभ उपरोक्त संदर्भ -११ मधील शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार लागू करावयाच्या असल्याने या शासन निर्णयातील परिच्छेद- १२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे याप्रकरणी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१. Ph.D. ही शैक्षणिक अर्हता धारण केलेले अधिव्याख्याता चार वर्षांच्या सेवेनंतर वरिष्ठ श्रेणीच्या इतर अटी व शर्तींच्या अधीन राहून वरिष्ठ वेतनश्रेणीसाठी पात्र ठरतील.
२. M.Phil. ही शैक्षणिक अर्हता धारण केलेले अधिव्याख्याता पाच वर्षांच्या सेवेनंतर इतर अटी व शर्तींच्या अधीन राहून वरिष्ठ वेतनश्रेणीसाठी पात्र ठरतील.
३. Ph.D. अथवा M.Phil. ही शैक्षणिक अर्हता धारण न केलेल्या अधिव्याख्यातांना सहा वर्षांच्या सेवेनंतर वरिष्ठ श्रेणीच्या इतर अटी व शर्तींच्या अधीन राहून सदर वेतनश्रेणी देय ठरेल



१६२

४. अधिव्याख्याता, निवडश्रेणीच्या पात्रतेसाठी अधिव्याख्याता, वरिष्ठ श्रेणी या पदावरील पाच वर्षे सेवा आवश्यक राहील.

५. करियर ॲडव्हांसमेंट योजना तंत्रनिकेतनात फक्त अधिव्याख्याता पदास लागू आहे परंतु अभियांत्रिकी महाविद्यालयात सदर योजना प्राध्यापक पदापर्यंत लागू असून सहाय्यक प्राध्यापक पदासाठी कमीतकमी Ph.D. ही शैक्षणिक अर्हता व अधिव्याख्याता वरिष्ठ श्रेणी या पदावरील पाच वर्षे सेवा आवश्यक असेल. ज्या अधिव्याख्यात्यांकडे Ph.D. ही अर्हता नसेल त्यांना फक्त अधिव्याख्याता निवडश्रेणी पर्यंत करियर ॲडव्हासमेंट योजनेंतर्गत लाभ देय ठरतील. प्राध्यापक पदासाठी सहाय्यक प्राध्यापक पदावरील आठ वर्षे सेवा आवश्यक आहे.

३. **दि.१.१.९६ पूर्वी सेवेत नियुक्त झालेल्या पदविका विभागातील शिक्षकांसाठी वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणीसाठी आवश्यक शैक्षणिक अर्हतेपासून सूट**

अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या उपरोक्त संदर्भ -६ मधील पत्रातील मुद्दा क्र.१० नुसार व संदर्भ-३ मधील शासन निर्णयानुसार दि. १.१.९६ पूर्वी पदविका संस्थात नियुक्त झालेल्या शिक्षकांना करियर ॲडव्हासमेंट योजनेअंतर्गत अधिव्याख्याता वरिष्ठ श्रेणी व अधिव्याख्याता निवड श्रेणीचा दर्जा प्राप्त करण्यासाठी सुधारित वाढीव शैक्षणिक अर्हता धारण करण्यापासून सूट देण्यात आली आहे.

४. **करीयर ॲडव्हान्समेंट योजनेअंतर्गत स्थान निश्चिती करण्यासाठी ग्राह्य धरावयाची सेवा**

उपरोक्त संदर्भ-४ मधील शासन निर्णयानुसार शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये व तंत्रनिकेतनातील शिक्षकांना करियर ॲडव्हासमेंट योजना लागू करताना समान प्रकरणी विद्यापीठ अनुदान आयोगाचे नियम व कायदे लागू करावयाचे असल्याने विद्यापीठ आयोगाचे पत्र क्र. एफ ३.१/९४(पीएस), दि.२४.१२.१९९८ च्या अनुषंगाने निर्गमित झालेल्या उपरोक्त संदर्भ -९ व १० मधील शासन निर्णयानुसार एक वर्षापेक्षा जास्त काळ केलेली शासकीय/ अशासकीय अनुदानित/ अशासकीय विना अनुदानित संस्थेतील तदर्थ/ नियमीत सेवा खालील परंतुकानुसार करियर ॲडव्हान्समेंट योजनेचे लाभ लागू करण्यासाठी ग्राह्य धरण्यात येईल.

अ) तदर्थ सेवा एक वर्षापेक्षा जास्त कालावधीची असावी.

ब) उमेदवाराची अधिव्याख्याता पदावरील नियुक्ती विहीत निवड समितीच्या शिफारशीनुसार झालेली असावी.

क) उमेदवाराच्या तदर्थ सेवेला जोडून त्यात कोणताही खंड न पडता सदर उमेदवाराची नियमित नियुक्ती झालेली असणे आवश्यक आहे.

ड) औपचारिकता म्हणून ६ महिने कालावधीअंतर्गत दिलेला सेवाखंड सलग सेवा गणताना विचारात घेऊ नये.

इ) महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत उमेदवार उपलब्ध होईपर्यंतच्या कालावधीसाठी विहीत सेवाप्रवेश नियमानुसार तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत गठित केलेल्या निवड समितीच्या शिफारशीनुसार झालेल्या तदर्थ नियुक्तीचा कालावधी करियर ॲडव्हान्समेंट योजनेनुसार स्थाननिश्चितीसाठी पात्र ठरेल.

फ) पदविका विभागाकडील पुर्वीची सेवा पदवी विभागात करीयर ॲडव्हान्समेंटसाठी ग्राह्य धरता येणार नाही. परंतु पदवी विभागाकडील पुर्वीची सेवा पदवीका विभागात करीयर ॲडव्हान्समेंटसाठी ग्राह्य धरता येईल.

ग) उपरोक्त संदर्भ - १४ मधील तरतुदीनुसार, करीयर ॲडव्हान्समेंट योजनेंतर्गत पात्र ठरणारी ११ वर्ष सेवा झालेल्या व वरिष्ठ श्रेणीत स्थान निश्चिती झालेल्या अधिव्याख्यातांना निवड श्रेणी लागु

करतांना वरीष्ठ श्रेणीतील ५ वर्ष सेवेची अट लागू न करता असे अधिव्याख्याते निवड श्रेणीच्या इतर अटी पुर्ण करीत असल्यास निवड श्रेणीस पात्र ठरतील.

ह) खाजगी विनाअनुदानित संस्थांतील तदर्थ / नियमित नियुक्तीचा कालावधीबाबत निम्न प्रमाणपत्र व दस्तावेज उपलब्ध करणे आवश्यक असेल.

१. खाजगी संस्थेतील नियुक्तीच्या आदेशाची साक्षांकीत प्रत
२. खाजगी संस्थेतील नियुक्ती ज्या अभ्यासक्रमावर झालेली असेल त्या अभ्यासक्रमासाठी अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद तथा शासनाची मान्यता प्राप्त असल्याचे शासनादेश
३. खाजगी संस्थेतील नियुक्तीच्या वेळी संबंधित शिक्षकीय पदासाठी संस्थेने निर्धारीत केलेली शैक्षणिक अर्हता शासनाने निर्धारीत केलेली शैक्षणिक अर्हतेशी समकक्ष होती याच्या पडताळणीसाठी संस्थेची सदर पदासाठीची जाहीरात अथवा तत्सम कागदपत्रे
४. खाजगी संस्थेतील सेवा कालावधीचा कार्यक्षमता तथा वर्तणूकी बाबतचा शेरा
५. खाजगी संस्थेतील पद हल्लीच्या पदाशी समकक्ष असणे आवश्यक राहील.

उपरोक्त स्पष्टीकरण व संदर्भ- १ ते ४ मधील शासन निर्णयातील अनुषंगिक बाबी विचारात घेऊन तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(मनीषा शिंदे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य, तंत्रशिक्षण परीक्षा मंडळ, मुंबई
४. सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण
५. उपसचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण परीक्षा मंडळ पुणे/औरंगाबाद/नागपूर
६. डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि. रायगड
७. सर्व शासकीय व शासन अनुदानित संस्थांचे प्राचार्य (संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत)
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ , मुंबई / नागपूर (लेखा परीक्षा)
९. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ , मुंबई / नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. निवड नस्ती, तांशि-६



164.